उच्च शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील प्रशासन अधिकारी (गट-अ) या पदाच्या सन २०१५ मधील बदल्यांबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बदली-२०१५ (२३१/१५)/मशि-१**
मंत्रालय विस्तार, मादाम कामा मार्ग
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
तारीख : २२/०७/२०१५.

# आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्य पार पडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(५) मध्ये विहीत केलेली तरतूदीस अनुसरुन उच्च शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील प्रशासन अधिकारी (गट-अ) या संवर्गात खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे बदल्या करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | प्रशासन अधिकाऱ्यांची नावे | सध्या कार्यरत असलेले कार्यालय | बदलीचे ठिकाण | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.प्रकाश बच्छाव, | उच्च शिक्षण संचालनालय (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे | सहसंचालक उच्च शिक्षण पुणे विभाग, पुणे | श्रीम. बोऱ्हाडे यांच्या बदलीने रिक्त पदी |
| २ | श्रीम. अर्चना बोऱ्हाडे, | विभागीय सहसंचालक उच्च शिक्षण पुणे विभाग, पुणे | उच्च शिक्षण संचालनालय (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे | श्री. बच्छाव, यांच्या बदलीने रिक्त पदी |

प्रशासकीय कारणास्तव बदली झालेल्या प्रशासन अधिकारी (गट-अ) यांना शासन नियमानुसार पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहिल.

बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ होण्याकरीता संबंधित कार्यालय प्रमुखांनी खालील सुचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

१. बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर संबधित कार्यालय प्रमुखांनी बदली झालेल्या प्रशासन अधिकाऱ्यांना पर्यायी प्रशासन अधिकारी हजर होण्याची वाट न पाहता बदली झालेल्या प्रशासन अधिकाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे.
२. पदस्थापनेत बदल करण्यासंदर्भात कोणत्याही विनंतीची दखल घेण्यात येणार नाही. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

३. बदली झालेल्या ठिकाणी रुजू होईपर्यंतच्या कालावधीत कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येणार नाही.

४. सदर बदल्यांची अंमलबजावणी प्रभावीपणे होणे गरजेचे असल्यामुळे बदली झालेल्या सर्व प्रशासन अधिकारी (गट-अ) यांच्या कार्यमुक्ततेच्या दिनाकांपर्यंत अथवा जास्तीत जास्त दिनांक ३१/०७/२०१५ पर्यंतचे वेतन ते सध्या कार्यरत असलेल्या कार्यालयाने काढावे. त्यानंतरचे वेतन कोणत्याही परिस्थितीत बदलीपुर्वीच्या कार्यालयाकडून काढण्यात येऊ नये, सदर वेतन संबंधित प्रशासन अधिकारी (गट-अ) बदलीच्या कार्यालयात रुजू झाल्यानंतर बदलीनंतरच्या कार्यालयाने काढावे. दिनांक ०१/०८/२०१५ पासुनचे वेतन बदलीपुर्वीच्या कार्यरत असलेल्या कार्यालयातून काढण्यात आल्यास त्या कार्यालयातील आंहरण व संवितरण अधिकारी यांना व्यक्तीश: जबाबदार धरण्यात येईल.

५. हे आदेश तात्काळ अंमलात येतील बदली झालेले प्रशासन अधिकारी (गट-अ) कार्यमुक्त होऊन बदलीच्या ठिकाणी रुजू झाल्याबाबतचा अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दिनांक ०१.०८.२०१५ पुर्वी शासनास सादर करावी. माहिती संचालनालयाने या विभागास कळवावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२२१४३४२५२००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Niwrutti B Marale

Digitally signed by Niwrutti B Marale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Niwrutti B Marale
Date: 2015.07.23 10:34:26 +05'30'

**नि.भा.मराळे**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण
३. सर्व प्राचार्य, शासकीय महाविद्यालये/संस्था
४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
७. सर्व संबंधित प्रशासन अधिकारी (गट-अ)
८. निवड नस्ती.

**प्रत** :- १. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव